**शासनाच्या मालकीचे सिर्कोस्की एस ७६ सी ++**
**या हेलिकॉप्टरच्या परिरक्षणाच्या कंत्राटाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः विचासं १११४/ प्र.क्र.४७/२८-अ**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ३२.
तारीख: २८ नोव्हेंबर, २०१४

**वाचा —**

१) शासन निर्णय क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग क्र.बीसीए-२०१२/ प्र.क्र.३६३/ २८-अ, दि.२२.०८.२००८.
२) विमानचालन संचालनालयाशी संबंधित मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील शक्ती प्रदत्त समितीच्या दि.१८.१०.२०१४ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
३) उप संचालक, विमानचालन यांचे क्र.डीए / एडीएम/१२१४/२०१४, दि.१.९.२०१४ चे पत्र.

**प्रस्तावना —**

विमानचालन संचालनालय, मुंबई अंतर्गत सिर्कोस्की एस ७६ सी ++ या हेलिकॉप्टरच्या परिरक्षणासाठी संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये ३ वर्षाकरीता करार केला असून हा करार दि.०६.०९.२०१४ रोजी संपुष्टात आला आहे. मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील विमानचालन क्षेत्राशी संबंधित शक्ती प्रदत्त समितीच्या दि.१८.१०.२०१४ च्या बैठकीमध्ये इंदमार कंपनीसोबत सध्या अस्तित्वात असलेल्या कराराचा कालावधी पुढील दोन वर्षाकरीता वाढविण्यासंबंधीच्या प्रस्तावास समितीने संदर्भ क्र.२ अन्वये अनुमती दिली आहे.

**शासन निर्णय—**

विमानचालन संचालनालय, मुंबई अंतर्गत शासनाच्या मालकीचे सिर्कोस्की एस ७६ सी ++या हेलिकॉप्टरच्या देखभाल व परिरक्षणासाठी संचालक, विमानचालन संचालनालय यांना राज्य शासनाच्या वतीने मे. इंदमार प्रा.लि. यांच्या समवेत करार करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे. संदर्भ क्र.१ अन्वये शासकीय हेलिकॉप्टर सिर्कोस्की एस ७६ सी ++ च्या परिरक्षणासाठी करार करण्यात आला होता. त्याच कराराचा कालावधी पुढील दोन वर्षाकरीता वाढविण्यास याद्वारे शासन अनुमती देत आहे. या कराराचा कालावधी दि.०७.०९.२०१४ ते ०६.०९.२०१६ पर्यंत राहिल. तसेच या करारात खालीलप्रमाणे तरतूद समाविष्ट करण्यात यावी;

“आवश्यकतेनुसार कराराचा कालावधी आणखी एका वर्षाने वाढविण्याचे अधिकार राज्य शासनास रहातील.”

या तरतूदीनुसार कराराचा कालावधी आणखीन एक वर्ष वाढविण्याबाबत निर्णय घेण्याचे अधिकार शासनाकडे राहतील.

२. या प्रित्यर्थचा खर्च क्र.ए-४, २०७० इतर प्रशासकीय सेवा (११४) परिवहन साधनांची खरेदी व परिरक्षण (००) (०२) शासनाचे विमानचालन विषयक सल्लागार या लेखाशिर्षांतर्गत २७- लहान बांधकामे या उद्दिष्टाखाली संबंधित आर्थिक वर्षातील मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागाविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. सदरचा शासन निर्णय मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील विमानचालन क्षेत्राशी संबंधित शक्ती प्रदत्त समितीच्या दि.१८.१०.२०१४ रोजी झालेल्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४११२८१५३३४४१६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAMEER ANANT SAWANT

Digitally signed by SAMEER ANANT SAWANT
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Dept, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SAMEER ANANT SAWANT
Date: 2014.11.28 16:59:30 +05'30'

**( समीर सावंत )**

**कार्यासन अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग**

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
२. अपर मुख्य सचिव (विमान चालन), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
३. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
४. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
५. प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग , मंत्रालय, मुंबई ३२.
६. प्रधान सचिव (उद्योग), उद्योग उर्जा व कामगार विभाग , मंत्रालय, मुंबई ३२.
७. प्रधान सचिव, मा.मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई ३२

८. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ.

९. उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी

१०.संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई ५६.

११.महालेखापाल, ( लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई.

१२.महालेखापाल, ( लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई.

१३.उप सचिव, (मुख्य सचिव यांचे कार्यालय), मंत्रालय, मुंबई ३२.

१४.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

१५.निवड नस्ती.